जिल्हाधिकारी, गडचिरोली यांच्या अधिनस्त क्षेत्रिय अधिकाऱ्यांना त्यांच्या जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास मंजुरी देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वाहन-२०२१/प्र.क्र.२११/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०२२.

**संदर्भ:**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. जेपीएस-२०१३/प्र.क्र.३१४/ई-८, दि.२१/०४/२०१६.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दि.२८/०७/२०२०.
३) जिल्हाधिकारी, गडचिरोली यांचे पत्र क्र. कार्या-२/जि.ना./सं.क्र.०३/ कावि/१०८७/२०२१, दि.०१/०९/२०२१.
४) उपायुक्त(सा.प्र.) विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर यांचे पत्र क्र.साप्रशा/कार्या-सि(१०) /कावि २६३/२०२१,दि.०१/०९/२०२१.

**प्रस्तावना:-**

नागपूर महसूल विभागातील लेखाशिर्ष "२०५३- जिल्हा प्रशासन" या खाली वेतन आहरित करणाऱ्या ११६ क्षेत्रीय अधिकाऱ्यांना शासकीय वाहनांची अनुज्ञेयता संदर्भाधीन दि.२१/०४/२०१६ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे. जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी त्यांच्या संदर्भाधीन दि.०१/०९/२०२१ च्या पत्रांन्वये त्यांच्या अधिपत्याखालील १) उप विभागीय अधिकारी, गडचिरोली, २) उप विभागीय अधिकारी, देसाईगंज ३) उप विभागीय अधिकारी, अहेरी ४) तहसिलदार,गडचिरोली,५) तहसिलदार, धानोरा, ६) तहसिलदार,आरमोरी, ७) तहसिलदार, कुरखेडा, ८) तहसिलदार, अहेरी या अधिकाऱ्यांच्या निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

नागपूर महसूल विभागातील लेखाशिर्ष "२०५३- जिल्हा प्रशासन" या खाली वेतन आहरित करणाऱ्या ११६ क्षेत्रीय अधिकाऱ्यांना शासकीय वाहनांची अनुज्ञेयता संदर्भाधीन दि.२१/०४/२०१६ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे. जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी त्यांच्या संदर्भाधिन दिनांक ०१/९/२०२१ च्या पत्रान्वये जिल्हाधिकारी,गडचिरोली त्यांच्या अधिपत्याखालील १) उप विभागीय अधिकारी, गडचिरोली, २) उप विभागीय अधिकारी, देसाईगंज ३) उप विभागीय अधिकारी,अहेरी ४) तहसिलदार, गडचिरोली, ५) तहसिलदार, धानोरा, ६) तहसिलदार,आरमोरी, ७) तहसिलदार, कुरखेडा, ८) तहसिलदार,अहेरी या एकूण ०८ क्षेत्रिय अधिकाऱ्यांना त्यांच्या पूर्वीच्या जुन्या निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहने खरेदी करण्यास व तदप्रित्यर्थ येणाऱ्या प्रत्येकी रुपये ८.०० लाख याप्रमाणे एकूण रुपये ६४.०० लक्ष (रुपये चौसष्ट लक्ष फक्त) च्या खर्चास खालील अटींच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे.-

१. **निधी उपलब्धतेनुसार** शासन निर्णय, वित्त विभाग क्र.-वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/ विनियम, दि.२८/०७/२०२० च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार सहपत्र "अ" उपविभागीय अधिकारी व तहसिलदार यांच्यासाठी प्रत्येकी रुपये ८.०० लाखाच्या कमाल मर्यादेत (वाहनाची किंमत + वस्तू व सेवा कर + टेम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + मूल्यवर्धित कर + सहाय्यभूत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करुन) वाहन खरेदी करण्यात यावी.

२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III / उद्योग-४, दि.०१/१२/२०१६ व क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४,दि.२४/०८/२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

३. शासन निर्णयासोबत सहपत्र “अ” मध्ये नमूद निर्लेखित वाहनाच्या बदली यापूर्वी नवीन वाहन खरेदी करण्यात आले नाही, या अटीच्या अधिन राहून नवीन वाहन खरेदीस शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयासोबतच्या सहपत्र “अ” मधील अनु.क्र. ०१ ते ०८ साठी येणारा खर्च “ सदर प्रस्तावातील खर्च लेखाशिर्ष मागणी क्रमांक सी-१, २०५३-जिल्हा प्रशासन (००) ०९३ जिल्हा आस्थापना ९३ (०१) सर्वसाधारण आस्थापना ०९३ (०१)(०५),आयुक्त नागपूर (२०५३ ०१०८) अंतर्गत सन २०२१-२२ या आथिक वर्षाकरीता उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून भागविण्यात यावा. तसेच सदर प्रयोजनार्थ अतिरिक्त निधीची मागणी न करता येणार नाही.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२०२१/सं.क्र.३७९/व्यय-९, दि.२९/१२/२०२१ अन्वये त्या विभागाने दिलेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३१५१५३८२२८६१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dr.SHWETA SAWDEKAR BAIG

Digitally signed by Dr.SHWETA SAWDEKAR BAIG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6281ac1913ceb1456ffcfd8e5d3dbe032cfa746426763d6351cb898b72986801, pseudonym=7EEE8BAF53B2BFC59945DABFC99C96C2C2709F7F, serialNumber=2FA86D3D30D0DE896CC35E8F420B067861B1ECA1D14FF010A5202C61E6ADC6FE, cn=Dr.SHWETA SAWDEKAR BAIG
Date: 2022.03.15 15:40:52 +05'30'

**( डॉ. श्वेता सावदेकर-बेग )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त,नागपूर.
२. जिल्हाधिकारी, गडचिरोली.
३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) -२, महाराष्ट्र, नागपूर .
४. उप विभागीय अधिकारी, गडचिरोली,देसाईगंज,अहेरी
५. तहसिलदार,गडचिरोली,धानोरा,आरमोरी,कुरखेडा,अहेरी
६. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
७. सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/विनियम), मंत्रालय, मुंबई-३२.
८. निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.

( शासन निर्णय क्रमांकः वाहन-२०२१/प्र.क्र.२११/ई-८) सोबतचे सहपत्र

**सहपत्र 'अ'**

नागपूर महसूल क्षेत्रिय स्तरावरील अधिका-यांच्या वापरातील निर्लेखित वाहनांचे विवरणपत्र

| अ.क्र. | विभाग/ जिल्हा | वाहन वापरणाऱ्या अधिकाऱ्याचे पदनाम | निर्लेखित वाहनाचा क्रमांक | वाहनाचा प्रकार |
|---|---|---|---|---|
| १ | नागपूर, जि.गडचिरोली | उप विभागीय अधिकारी, गडचिरोली | एम.एच. ३३ सी-०१८६ | जीप |
| २ | | उप विभागीय अधिकारी, देसाईगंज | एम.एच. ३३ सी-०१८७ | जीप |
| ३ | | उप विभागीय अधिकारी,अहेरी | एम.एच. ३३ सी-०१२० | जीप |
| ४ | | तहसिलदार, गडचिरोली | एम.एच. ३३ सी-०१८५ | जीप |
| ५ | | तहसिलदार, धानोरा | एम.एच. ३३ सी-०११५ | जीप |
| ६ | | तहसिलदार, आरमोरी | एम.एच. ३३ सी-०१२२ | जीप |
| ७ | | तहसिलदार, कुरखेडा | एम.एच. ३३ सी-०१८४ | जीप |
| ८ | | तहसिलदार, अहेरी | एम.एच. ३३ सी-०१८८ | जीप |